राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत तलाठी प्रशिक्षण कार्यक्रमांच्या खर्चासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.



**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.५०/ई-१०**
पहिला मजला, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २९ मार्च, २०२३

**वाचा :-** (१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दि.२३/०९/२०११
(२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.तप्रशि-२०१२/प्र.क्र.२४२-अ/ई-१०, दि.२४/०३/२०१४
(३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.टीआरएन-२०१४/४४०/प्र.क्र.६६/१४/१२-अ, दि.०१/११/२०१४
(४) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र.आकाअ/भूसु/अ.का.२/कावि-/२०२३,दि.०८/०२/२०२३
(५) मराठवाडा महसुल प्रशिक्षण प्रबोधिनी औरंगाबाद यांचे पत्र क्र.अ.शा.प.२०२३/ममप्र/औ/लेखा /२०२२-२०२३/कावी, दि.०२/०२/२०२३
(६) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१६/०३/२०२३

**प्रस्तावना :-**

शासनाने राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत तलाठी पदावर प्रथम नियुक्ती देण्यापूर्वी नवनियुक्त तलाठी कर्मचाऱ्यांना सहा महिन्याचे पायाभूत प्रशिक्षण देण्याबाबत संदर्भाधिन संदर्भ क्र.(२) येथील दि.२४/०३/२०१४ अन्वये निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार नवनियुक्त तलाठी (गट-क) संवर्गाच्या कर्मचाऱ्यांना माहे जानेवारी-२०२० ते नोव्हेंबर-२०२३ या कालावधीत पाच बॅचेसमध्ये एकूण-१२९ प्रशिक्षणार्थींना मराठवाडा महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद येथे प्रशिक्षण देण्यात आलेले आहे. त्यानुसार विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी सदर प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत देण्यात आलेल्या प्रशिक्षण शुल्काचा रु.२,११,४८,८००/- इतका निधी प्रशिक्षण केंद्रास उपलब्ध करुन देण्याची विनंती केलेली आहे.

त्याचप्रमाणे विभागीय आयुक्त, अमरावती यांनी अमरावती विभागातील नवनियुक्त तलाठी (गट-क) संवर्गाच्या कर्मचाऱ्यांना माहे ऑक्टोबर-२०२१ ते ऑगस्ट-२०२२ या कालावधीत चार बॅचेसमध्ये एकूण-१७२ प्रशिक्षणार्थींना देण्यात आलेल्या प्रशिक्षण शुल्काचा रु.३,०९,६०,०००/- इतका निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती केलेली आहे.

त्यानुषंगाने आर्थिक वर्ष २०२२-२०२३ करीताचा (२०५२ ५२०५) या लेखाशिर्षाअंतर्गत मंजूर निधीपैकी शिल्लक असलेल्या निधीतून राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत देण्यात आलेल्या प्रशिक्षण शुल्काचा निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत महसूल विभागातील तलाठी संवर्गातील कर्मचाऱ्यांना देण्यात येणाऱ्या प्रशिक्षणाकरीता विभागीय आयुक्त, औरंगाबाद व विभागीय आयुक्त, अमरावती यांना खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

| विभाग | मागणीची रक्कम | मंजूर केलेला निधी | वितरीत केलेला निधी |
|---|---|---|---|
| **विभागीय आयुक्त, औरंगाबाद** (मराठवाडा महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद) | रु.२,११,४८,८००/- | रु.५८,२७,००० | रु.५८,२७,००० |
| **विभागीय आयुक्त, अमरावती** | रु.३,०९,६०,०००/- | रु.५८,२७,००० | रु.५८,२७,००० |
| **एकूण** | **रु.५,३८,४१,०१०/-** | **रु.१,१६,५४,०००/-** | **रु.१,१६,५४,०००/-** |

२. सदरचा मंजूर करण्यात आलेला निधीचा खर्च विभागीय आयुक्त, औरंगाबाद व अमरावती यांनी **मुख्य लेखाशीर्ष मागणी क्र.सी-४, २०५२ सचिवालयीन सर्वसाधारण सेवा, (००) (०१) शासकीय कर्मचाऱ्यांचे प्रशिक्षण (२०५२ ५२०५) २०-इतर प्रशासकीय खर्च** या उद्दीष्टांतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीताच्या अर्थसंकल्पिय मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढलेली रक्कम, महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री संबंधितांनी करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

४. संस्थेने वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र महालेखापाल, लेखापरीक्षा महाराष्ट्र १/२ व शासनास तातडीने सादर करावे.

५. सदर शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१६/०३/२०२३ प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०३२९१९५६५२८२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने, SANJAY BANKAR

Digitally signed by SANJAY BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, pseudonym=B37546F6A6BD466ED45270ED708F924F51A07EA8, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY BANKAR
Date: 2023.03.29 20:03:29 +05'30'

**( संजय बनकर )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १, मुंबई

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र २, नागपूर
३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. विभागीय आयुक्त, अमरावती / औरंगाबाद
६. सह सचिव, वित्त विभाग (अर्थ-३), मंत्रालय, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, (ब-१ / ब-२ / ई-१अ ) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (कार्यासन ई-१०) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.